महाराष्ट्र राज्य लॉटरी
महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडत-२०१४ बक्षिस रचना व कार्यपध्दती.

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मरालॉ- २०१४/ प्र.क्र. ५५ / लॉटरी-२

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२
तारीखः ३० जुलै,२०१४

वाचा -

**१) शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१२/प्र.क्र.४७/ लॉटरी -२, दिनांक ०८.०५.२०१२.**

**शासन निर्णय -**

महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडत ही केंद्र शासनाचा लॉटरी नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित केली आहे. शासनाने ही सोडत दिनांक १०.९.२०१४ रोजी काढण्याचा निर्णय घेतला आहे.

२. शासनाने महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडत या भव्यतम सोडतीच्या तिकीटाचे मूल्य रू. १००/- ठेवले असून रु. १,११,००,०००/- चे पहिले (सामायिक) बक्षिस ठेवले आहे. या सोडतीत एकुण ६ मालिका असून प्रत्येक मालिकेत १ लाख तिकीटे या प्रमाणे एकूण ६ लाख तिकीटे मुद्रीत करण्यात येणार आहेत. प्रत्येक मालिकेतील तिकीटांचे क्रमांक ००००० ते ९९९९९ या प्रमाणे देण्यात आलेले आहेत.

३. या भव्यतम सोडतीमध्ये एक विशेष तिकीट योजना ठेवण्यात आली असून सोडतीची कोणतीही ६ तिकीटे खरेदी करणा-या ग्राहकास एक विशेष तिकीट मोफत देण्यात येईल.या तिकीटांची संख्या एक लाख इतकी असून त्यांचे क्रमांक ००,००० ते ९९,९९९ असे असतील.या विशेष सोडतीमध्ये रू.१ लाखाची ५ बक्षिसे व रू.५,००० ची ४५ बक्षिसे अशी एकुण रू.७,२५,००० ची ५० बक्षिसे ठेवण्यात आली आहेत.

४. महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडतीची तिकीटे विक्री करणाऱ्या विक्रेत्यास पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसपात्र तिकीटाची विक्री केल्याबद्दल रू. १,११,०००/- इतका बोनस देण्यात येईल. रू. १०,०००/- व त्याखालील असणाऱ्या सर्व बक्षिसांचे प्रदान तिकीट विजेत्यास केल्याबद्दल विक्रेत्यांना २% सेवाआकार देण्यात येईल.

५. महाराष्ट्र शासनाने या सोडतीची तिकीट विक्री शिवडी कार्यालयामार्फत करण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडत या भव्यतम सोडतीची तिकीटे उपसंचालक

(वि. व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, क्लॅरेज हाऊस, हाजी बंदर रोड, शिवडी (पू), मुंबई-४०००१५ येथून राज्य लॉटरीचे सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील.

६. या सोडतीची तिकीट विक्री करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांचे एका पुस्तकावरील (M.R.P. Rs.१००/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर खरेदी करण्यात आलेल्या या सोडतीच्या एकूण लॉटरी तिकीटांवर पुढीलप्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| तिकीटांची संख्या | प्रस्तावित घाऊक सूट |
|---|---|
| ५०० ते ५०,००० | २०% |
| ५०,००१ ते १,००,००० | २२% |
| १,००,००१ ते १,५०,००० | २४% |
| १,५०,००१ ते २,००,००० | २८% |
| २,००,००१ ते ६,००,००० | ३०% |

अभिकर्त्यांना देण्यात येणाऱ्या २% विशेष सूटीबाबतच्या अटी व शर्ती, शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक मरालॉ २०१२/प्र.क्र४७/ लॉटरी -२,दिनांक ०८/०५/२०१२ नुसार लागू राहतील.

७. या सोडतीच्या तिकीट छपाईचे आदेश उपसंचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. या तिकीटाचे आकारमान २४ x १४ cms असून यासाठी १३० GSM Indian Art Paper वापरण्यात येऊन त्याचा दर प्रती एक लाख तिकीटाकरिता रू. ४९,८७०/- असा राहील. त्याचप्रमाणे छपाई करण्यात येणारे विशेष तिकीटाचे आकारमान १८ x ०८ cms असून यासाठी ८० GSM poster Paper वापरण्यात येऊन त्याचा दर प्रती एक लाख तिकीटाकरिता रू. १४,२५६/- असा राहील. या सोडतीच्या सर्व प्रकारच्या तिकीटांची छपाई मे. साई सिक्युरिटी प्रिंटर्स प्रेस प्रा. लि. फरीदाबाद यांचेकडून करून घेण्यात येतील.

८. घाऊक अभिकर्त्याने ज्या किरकोळ अभिकर्त्यांस तिकीटे विकली असतील त्या किरकोळ अभिकर्त्यांची यादी (तिकीटांच्या क्रमांकासह) घाऊक अभिकर्त्याने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या शिवडी कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

९. या सोडतींची बक्षिसरचना व बक्षिसे निश्चित करण्याची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे राहील.

**महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडत**

मालिका : ६

तिकीटांचे क्रमांक ००००० ते ९९९९९

सोडत दिनांक व वेळ :
दि.१०/०९/२०१४, सायं ४.००वा.

प्रत्येक मालिकेत : १००००० तिकीटे

एकूण तिकिटे : ६ लाख

तिकीटांची किंमत : रू.१००/-

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कमरू. | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम रु. | विक्रेता बोनस (प्रत्येक मालिकेत)रु. | एकूण विक्रेता बोनस |
|---|---|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक) बक्षिस (पूर्ण क्रमांक) | १,११,००,००० | -- | १ | १,११,००,००० | १,११,००० | १,११,००० |
| प्रोत्साहनपर बक्षिस (पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित ५ मालिकांसाठी पहिल्या बक्षिसाचा क्रमांक) | ४,००,००० | -- | ५ | २०,००,००० | -- | -- |
| दुसरे बक्षिस (४ पूर्ण क्रमांक) (प्रत्येक मालिकेत) | १,००,००० | ४ | २४ | २४,००,००० | -- | -- |
| तिसरे बक्षिस (शेवटचे ४ अंक ) (प्रत्येक मालिकेत) | १०,००० | १० | ६० | ६,००,००० | -- | -- |
| चौथे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (प्रत्येक मालिकेत) | ५,००० | १० | ६० | ३,००,००० | -- | -- |
| पाचवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (प्रत्येक मालिकेत) | २,००० | १० | ६० | १,२०,००० | -- | - |
| सहावे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (१० जुळवण्या) | १,००० | -- | ६०० | ६,००,००० | -- | -- |
| सातवे बक्षिस (शेवटचे ४ अंक) (१० जुळवण्या) | ५०० | -- | ६०० | ३,००,००० | -- | -- |
| आठवे बक्षिस (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी १० व्या क्रमांकास ) | २०० | -- | ६०००० | १,२०,००,००० | -- | -- |
| **एकूण** | -- | -- | **६१,४१०** | **२,९४,२०,०००** | **१,११,०००** | **१,११,०००** |

**१०. <u>सोडतीची कार्यपध्दती :-</u>**

**१०.१** या सोडतीचे बक्षिस विजेते क्रमांक निश्चित करण्यासाठी सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ६ ड्रम्स ठेवले जातील. प्रत्येक मालिकेमध्ये ००,००० ते ९९,९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकांचे क्रमांक असतील. उर्वरित ५ ड्रम्समध्ये ० ते ९ अंकाची प्रत्येकी एक चकती याप्रमाणे प्रत्येकी १० चकत्या ठेवण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल.त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील व तो क्रमांक विजेता म्हणून घोषित केला जाईल.

**१०.२ <u>दुसरे बक्षिस रू. १,००,०००/- :</u>** दुस-या रू. १,००,०००/- च्या बक्षिसाकरिता चार पूर्ण भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येतील.

**<u>१०.३ तिसरे बक्षिस रू. १०,०००/-</u>** तिसऱ्या रु. १०,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक वेगवेगळी जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. १०,०००/- च्या तिसऱ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**१०.४ <u>चौथे बक्षिस रू. ५,०००/-</u>** चौथ्या रु. ५,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक वेगवेगळी जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. ५,०००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**१०.५ <u>पाचवे बक्षिस रू. २,०००/-</u>** पाचव्या रु. २,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक वेगवेगळी जुळवणी प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्रपणे काढण्यात येईल. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल अशी त्या त्या मालिकेतील सर्व तिकीटे रू. २,०००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**१०.६ <u>सहावे बक्षिस रू. १,०००/-</u>** सहाव्या रु. १,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी याप्रमाणे १० जुळवण्या स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल अशी सर्व तिकीटे रू. १,०००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**१०.७ <u>सातवे बक्षिस रू. ५००/-</u>** सातव्या रु. ५००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाची एक जुळवणी याप्रमाणे १० जुळवण्या स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल अशी सर्व तिकीटे रू. ५००/- च्या सातव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**१०.८ <u>आठवे बक्षिस रू. २००/-</u>** आठव्या रु. २००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून कोणत्याही ४ अंकांचा एक क्रमांक काढण्यात येईल. त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणा-या प्रत्येकी १० व्या क्रमांकाची तिकीटे रू. २००/- च्या आठव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

**१०.९ <u>पहिले (सामायिक) बक्षिस रू.१,११,००,०००/-</u>**

या सोडतीमध्ये एकूण ६ मालिका आहेत. या सहा मालिकात मिळून **रूपये एक कोटी अकरा लाखाचे (सामायिक) पहिले बक्षिस** ठेवण्यात आले आहे. प्रथमत: सहा मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र आवरणात(पिशवीत) ठेऊन ड्रममध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी (पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद १०.१ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

**१०.१० <u>प्रोत्साहनपर बक्षिस रू. ४,००,०००/- ची ५ बक्षिसे काढण्याची कार्यपध्दती :</u>** प्रोत्साहनपर रू. ४,००,०००/- च्या बक्षिसाकरिता पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित ५ मालिकांकरिता पहिल्या बक्षिसासाठी निश्चित करण्यात आलेल्या भाग्यवान क्रमांकास रू. ४,००,०००/- चे प्रोत्साहनपर बक्षिस देण्यात येईल.

**<u>विशेष तिकीट योजना-</u>**

महाराष्ट्र गणपती भव्यतम सोडतीकरिता विशेष तिकीट योजना ठेवण्यात आली आहे.या सोडतीची कोणतीही ६ तिकीटे खरेदी करणा-या ग्राहकास एक विशेष तिकीट मोफत देण्यात येईल.एकुण विशेष तिकीटांची संख्या १ लाख असून तिकीटांचे क्रमांक ००,००० ते ९९,९९९ असून या सोडतीची बक्षिसरचना पुढीलप्रमाणे असेल.

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम रू. | बक्षिसांची एकूण संख्या | बक्षिसांची एकूण रक्कम रु. |
|---|---|---|---|
| पहिले बक्षिस( पूर्ण क्रमांक) | १,००,००० | ५ | ५,००,००० |
| दुसरे बक्षिस(शेवटचे ४ अंक) | ५,००० | ४५ | २,२५,००० |
| **एकूण** | -- | ५० | **७,२५,०००** |

## ११. <u>विशेष तिकीट सोडतीची कार्यपध्दती :-</u>

### ११.१ <u>पहिले बक्षिस रू.१,००,०००/- ची ५ बक्षिसे-</u>

या विशेष सोडतीचे बक्षिस विजेते क्रमांक निश्चित करण्यासाठी सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ५ ड्रम्स ठेवले जातील. या सोडतीसाठी ००,००० ते ९९,९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. या ५ ड्रम्समध्ये ० ते ९ अंकाची प्रत्येकी एक चकती याप्रमाणे प्रत्येकी १० चकत्या ठेवण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अशा पध्दतीने पहिल्या रू. १ लाखाच्या ५ बक्षिसांसाठी ५ भाग्यवान क्रमांक निश्चित केले जातील.

**११.२ <u>दुसरे बक्षिस रू. ५,०००/- :</u>** दुस-या रू. ५,०००/- च्या बक्षिसाकरिता पहिल्या रू. १ लाखाच्या बक्षिसासाठी निश्चित केलेल्या भाग्यवान क्रमांकातील शेवटचे चार अंक पहिल्या बक्षिसाचा क्रमांक वगळून दुस-या बक्षिसासाठी पात्र असेल.

१२. या सोडतीच्या तिकीट छपाईचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी १६ प्रकाशने व बक्षिस विजेत्या तिकीटांचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००)१०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२)(००)(०१) प्रमुख लॉटरी ०५ बक्षिसे या लेखाशिर्षामधील उपलब्ध तरतूदींतून भागविण्यात यावा.

१३. पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

१४. या सोडती मधील कोणत्याही मालिकेमध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

१५. या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

१६. महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक किंवा जुळवण्या काढण्यात येत असतील अशा वेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक /एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

१७. सदरच्या सोडतीची कार्यपध्दती पूर्ण झाल्यानंतर शासनाच्या विहित तरतूदीं / कायद्यानुसार या सोडतीच्या निकालाची प्रसिध्दी शासनाच्या राजपत्रात करण्याची कार्यवाही उपसंचालक (वि.वले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून करण्यात येईल व याबाबतची सर्व जबाबदारी त्यांची राहील.

१८. वर नमुद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

**१९.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७३०१४२४०३२७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajitsingh Ramsingh Rajput

Digitally signed by Ajitsingh Ramsingh Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Directorate of Lotteries, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajitsingh Ramsingh Rajput
Date: 2014.07.30 14:23:44 +05'30'

**(अ. रा. राजपुत)**
कार्यासन अधिकारी,वित्त विभाग तथा
राज्य लॉटरी अधिकारी

**प्रत,**

१. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री , गृह, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री, वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था) मुंबई यांचे स्वीय सहायक.
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
८. आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
९. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
११. उप सचिव राज्य लॉटरी यांचे स्वीय सहाय्यक
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पूर्व) मुंबई १५.
१५. कक्ष अधिकारी, प्रशा-४,/ लॉ-३/लेखाधिकारी-अर्थसंकल्प (लॉटरी), वित्त मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती, लॉटरी -२.